**पदनिर्मितीचे प्रस्ताव सादर करतांना**
**प्रशासकीय विभागांनी विचारात घ्यावयाचे मुद्दे**

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन परिपत्रक क्र. पदनि २०१०/८४/१०/विसु-१
मंत्रालय, मुंबई – ४०० ०३२.
**दिनांक : २७ सप्टेंबर, २०१०.**

**-: परिपत्रक :-**

राज्याच्या अर्थसंकल्पिय तरतुदीतील आस्थापना खर्च नियंत्रणात ठेवणे आवश्यक असून, त्यामुळे विकासात्मक कामांसाठी / कार्यक्रमांसाठी अधिक निधी उपलब्ध करुन देणे शक्य होते. विविध विभागाकडून सादर होणारे पद निर्मितीचे प्रस्ताव पाहता प्रस्तावाचा वाढीव आर्थिक भार कृत्रिमरित्या कमी दाखविला जातो. कंत्राटी पद्धतीने अत्यंत कमी मानधन सुरुवातीच्या काही वर्षांसाठी दाखविले जाते. सदर कंत्राटी पध्दतीचे कर्मचारी कालांतराने न्यायाधिकरण / न्यायालयातून आदेश मिळवून शासन सेवेत कायम होतात व त्यांना नियमित वेतनश्रेणीवर घ्यावे लागते व त्यामुळे आवर्ती खर्चात मोठी वाढ होते. केंद्र शासनही त्यांच्या विविध योजना राबविण्यासाठी ठराविक वर्षांसाठी निधी उपलब्ध करुन देते, मात्र कायमस्वरुपी आस्थापना खर्चाची जबाबदारी घेत नाही. केंद्रिय अनुदान बंद झाल्यानंतर अशा कर्मचाऱ्यांच्या वेतनावरील बोजा कायमस्वरुपी राज्य शासनावर पडतो.

वरील पार्श्वभूमीवर प्रशासनावरील खर्च आटोक्यात ठेऊन विकासासाठी पुरेसा निधी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहे

१) शासनासमोर / मंत्रीमंडळासमोर प्रस्ताव आणताना विभागांनी कृत्रिमरित्या वेतनावरील खर्च कमी दाखवू नये. कंत्राटी पध्दतीने मानधनावर नेमणूका करणे प्रारंभी अपेक्षित असले, तरी मानधनावरील खर्च, त्यात भविष्यात होणारी वाढ व कालांतराने असे कर्मचारी शासन सेवेत घ्यावे लागल्यास वेतनश्रेणीनुसार त्यांच्या वेतनावरील संभाव्य खर्च स्पष्टपणे नमूद करावा

२) अत्यंत अपवादात्मक परिस्थितीत / अत्यावश्यक असल्याशिवाय, पदनिर्मितीचे प्रस्ताव विभागांनी आणू नयेत. अधिकारी स्तरावरची पदनिर्मिती प्रस्तावित करणे अपरिहार्य असल्यास त्यासाठी आवश्यक पुरक कर्मचारी वर्ग शक्यतो Outsourcing ने देण्याचा प्रयत्न असावा

३) एखादया विशिष्ट कार्यक्रमांतर्गत अपरिहार्यपणे वाढीव पदे आवश्यक असल्यास पदनिर्मिती सुचविण्याऐवजी त्या कार्यक्रमाच्या कालावधीपुरतीच मानधनावर कामे करुन घ्यावीत, व त्यासाठी शासनाने स्वतः कंत्राटी पध्दतीने नेमणूका करण्याऐवजी, बाहय यंत्रणेकडून (Outsourcing द्वारे) कामे प्रस्तावित करावीत.

४) उपलब्ध / मर्यादित मनुष्यबळाच्या आधारे प्रभावी कामकाजासाठी विभागांनी माहिती तंत्रज्ञानाचा वापर करावा.

५) तसेच विभागांनी त्यांचेमार्फत दिल्या जाणाऱ्या सेवा / सुविधांच्या कार्यपध्दतीचा आढावा (Business Process Reengineering) घेऊन कार्यपध्दती सुटसुटीत करावी.

६) शासकीय कार्यालयातून वर्षानुवर्षे केली जाणारी, पण सध्याच्या बदललेल्या स्थितीत जी सहजपणे बाहेरुन करुन घेता येतील, अशी कामे शासकीय कर्मचाऱ्याकडून करुन घेण्याऐवजी ती शक्यतो बाहय यंत्रणेकडून (Outsourcing द्वारे) करण्याचे पर्याय अवलंबावेत.

७) सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००९२११९१९४००१** आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**( शं.ग. सातपुते )**
**उपसचिव**

**प्रत :** सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य,

मा.राज्यपालांचे सचिव,

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव

सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक

मा.मुख्य सचिव यांचे सचिव.

सर्व मंत्रालयीन विभाग,

महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.

सर्व उपसचिव / सहसचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

विभागातील सर्व कार्यासने.

**वित्तीय सुधारणा कार्यासन संग्रहार्थ.**

--------